परिविक्षाधीन उपअधीक्षक,राज्य उत्पादन शुल्क विभाग(गट-ब) पदावरील सेवा समाप्त करून अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे परत पाठविण्याबाबत-

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. इएसटी २७/०८/ प्र.क्र.१७९ / इएक्ससी - ४,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १६ नोव्हेंबर, २००९.

वाचा: १)शासन पत्र,वित्त विभाग क्र.असंक १००४/स.क्र.१३८६/०४/विजय सुधारणा-१ दि १/१२/२००४

२)शासन निर्णय,गृह विभाग क्र.इएसटी २००४/प्र.क्र.८६/इएक्ससी-४ दि.१६/२/२००५ व शुध्दीपत्रक दि.३१/१/२००९

३)शासन निर्णय,गृह विभाग क्र.इएसटी २००४/प्र.क्र.८६/इएक्ससी-४ दि.१८/३/२००५ व शुध्दीपत्रक दि.३१/३/२००९

४) शासन पत्र,गृह विभाग क्र.इएसटी २००५/प्र.क्र.१४७/इएक्ससी-४ दि.८/२/२००८.

५) आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांचे पत्र क्र.इएसटी ११०८/७२दोन अ-१ दि.२१/२/२००९.

प्रस्तावना:- पाटबंधारे विभागाच्या आधिपत्याखाली अतिरिक्त ठरलेल्या सर्वश्री विठ्ठल मारुतीराव लंगर,श्री.बापुसाहेब विश्वनाथ पटारे,सहायक अभियंता,श्रेणी-२ (कृषी) या अधिकाऱ्यांचा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये व सर्वश्री सुधीर लक्ष्मण आढाव व विजय दामू शालूल,सहायक अभियंता,श्रेणी-२ (कृषी) या अधिकाऱ्यांची संदर्भ क्र.३ येथील शासननिर्णयान्वये, संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सदर अधिकारी शैक्षणिक अर्हता व शारीरिक पात्रता पूर्ण करत असल्यामुळे परीविक्षाधीन उपअधीक्षक,राज्य उत्पादन शुल्क विभाग(गट-ब) या पदावर सदर शासननिर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन अतिरिक्त संवर्गातून उपअधीक्षक (गट-ब) संवर्गातील नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदावर तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात आली.

सदर अधिकाऱ्यांच्या नियुक्तीच्यावेळी उपअधीक्षक,राउशु (गट-ब) पदाच्या प्रचलित दि.१/४/१९८० च्या सेवाप्रवेश नियमातील नियम ८ नुसार सरळसेवेने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते.सदर अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतच्या संदर्भ क्र.२ व ३ येथील शासननिर्णयांतील परिच्छेद १ मधील अट क्र.२ नुसार सदर अधिकाऱ्यांचा परीवीक्षा कालावधी नियुक्तीच्या पदावर रुजू झालेल्या तारखेपासून २ वर्षांचा आहे.अट क्र.५ नुसार त्यांनी नेमणूक केलेल्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत परीविक्षा कालावधीमध्ये विहीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे तसेच अट क्र.९ नुसार दोन वर्षांच्या आत किंवा वाढविलेल्या परीविक्षा कालावधीमध्ये विभा चाचण्या व परीक्षेत उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणूकीबद्दल अपराधी आढळले तर त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल अशी तरतूद आहे.

सर्वश्री लेंगरे व पटारे हे अधिकारी परीविक्षाधीन उपअधीक्षक,राउशु (गट-ब) पदावर अनुक्रमे दि.२२/२/२००५ व दि.२१/२/२००५ रोजी रूजू झाले तसेच सर्वश्री आढाव व शार्दूल हे अधिकारी परीविक्षाधीन उपअधीक्षक,राउशु (गट-ब) या पदावर दि.२३/३/२००५ रोजी रूजू झाले.संदर्भ क्र.२ व ३ येथील शासननिर्णयातील अटी व शर्तीनुसार या अधिकाऱ्यांनी सदर पदासाठीची विहीत विभागीय परीक्षा नेमणूक केल्याच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत परिविक्षा कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे तथापि हे अधिकारी सदर विभागीय परीक्षा २ वर्षांच्या आत उत्तीर्ण होऊ शकले नाहीत त्यामुळे त्यांना शासनमान्यतेने एक वर्ष अथवा दोन संधी देण्याबाबत तसेच या अटीनुसार विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांची राज्य उत्पादन शुल्क विभागातील उपअधीक्षक,राउशु (गट-ब) पदावरील सेवा समाप्त करून त्यांना वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे पाठविण्यात येईल असे त्यांच्या निदर्शनास आणण्याच्या सूचना आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क यांना संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये देण्यात आल्या.

आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांच्या संदर्भ क्र.५ येथील पत्रानुसार सदर अधिकाऱ्यांना सन २००६ पासून परीक्षेला बसण्यासाठी एकूण ७ संधी मिळाल्या आहेत त्यापैकी सर्वश्री लेंगरे,पटारे,शार्दुल व आढाव यांनी अनुक्रमे ३,४,४ व ५ संधी उपभोगल्या आहेत. उपरोक्त नमूद चारही अधिकारी वाढीव कालावधी/संधीमध्येही विभागीय परीक्षा उत्तीर्ण होऊ शकले नाहीत त्यामुळे त्यांच्या परीविक्षाधीन उपअधीक्षक (गट-ब) पदावरील सेवा समाप्त करून त्यांना वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे परत पाठविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- सर्वश्री विठ्ठल मारूतीराव लेंगरे,श्री.बापुसाहेब विश्वनाथ पटारे, सुधीर लक्ष्मण आढाव व विजय दोधू शार्दूल,सर्व परीविक्षाधीन उपअधीक्षक (गट-ब) यांनी संदर्भ क्र. २ व ३ येथील त्यांच्या परीविक्षाधीन उपअधीक्षक,राउशु (गट-ब) पदावरील नियुक्तीबाबतच्या शासननिर्णयातील परिच्छेद १ मधील अट क्र.५ नुसार नेमणूक केलेल्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत परीविक्षा कालावधीमध्ये विहीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते तथापि सदर परीविक्षाधीन अधिकारी यांव्यतिरिक्त अतिरिक्त एक वर्ष अथवा २ संधी देऊनही विहीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे त्यांची परीविक्षाधीन उपअधीक्षक,राउशु (गट-ब) पदावरील नियुक्ती शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून समाप्त करून त्यांच्या सेवा वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यास शासनमान्यता देण्यात येत आहे.

२.	हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या,शासन परिपत्रक,क्र.एसआरव्ही १०९९/प्र.क्र.२/९९/आठ दि.२१/३/२०००अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१११२१९२९१४००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र.ता.गौड )
सह सचिव,महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा अधिकारी,मुंबई
वित्त विभाग/अतिरिक्त संवर्ग कक्ष,मंत्रालय,मुंबई-४०००३२
सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क (आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांचेमार्फत)
सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,(आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांचेमार्फत)
जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक,ठाणे,सोलापूर
सर्वश्री विठ्ठल मारुतीराय लेंगरे,श्री.बापुसाहेब विश्वनाथ पटारे, सुधीर लक्ष्मण आढाव व विजय दोधू शार्दूल यांना आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांचेमार्फत
निवडनस्ती / इएक्ससी - ४

********